**महाराष्ट्र पर्यावरण व अभियांत्रिकी प्रशिक्षण आणि संशोधन संस्था (मीत्रा), नाशिक या संस्थेने आयोजित केलेल्या प्रशिक्षणाचा खर्च भागविण्यासाठी या संस्थेला वेतनेतर अनुदान वितरीत करण्याबाबत .**

## महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
### शासन निर्णय क्रमांकः मिप्रदे-३९२३/प्र.क्र.६५/पापु-२३

७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल
क्रॉफर्ड मार्केटजवळ, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-४००००१
तारीख: २९ मार्च, २०२३

वाचा:-

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक टिआरएन-२००९/प्र.क्र.३९/२००९/१२-अ, दिनांक २३.०९.२०११
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांकः टिआरएन-२०१४/४४०/प्र.क्र.६६/१४/१२-अ, दिनांक १.११.२०१४.
३) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांकः आस्था-४९२१/प्र.क्र.२०९/पापु-०१, दिनांक २८.०९.२०२१
४) शासन पत्र, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांकः आस्था ४९२०/प्र.क्र.८०/पापु-०१, दिनांक २२.१२.२०१०.
५) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांकः अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक ४.०४.२०२२.
६) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांकः मिप्रदे-३९२२/प्र.क्र.१०५/पापु-२३, दिनांक १३.०९.२०२२

प्रस्तावना:-

सामान्य प्रशासन विभागाने संदर्भाधीन (१) च्या शासन निर्णयान्वये राज्य प्रशिक्षण धोरण २०११ घोषित केले आहे. त्यानुषंगाने पाणीपुरवठा व स्वच्छता विभागांतर्गत क्षेत्रिय कार्यालयातील अधिकारी/कर्मचाऱ्यांना प्रशिक्षण देण्याच्या दृष्टीने महाराष्ट्र पर्यावरण व अभियांत्रिकी प्रशिक्षण आणि संशोधन संस्था (मीत्रा), नाशिक या संस्थेला विभागाची राज्यस्तरीय प्रशिक्षण संस्था म्हणून संदर्भाधीन

(३) च्या शासन निर्णयान्वये घोषित करण्यात आले आहे. या संस्थेकडून आयाजित करण्यात येणाऱ्या प्रशिक्षणाचे दर हे राज्य प्रशिक्षण धोरणाच्या दरानुसार ठेवण्याची तरतूद संदर्भाधीन दिनांक २८.०९.२०२१ च्या शासन निर्णयान्वये करण्यात आली आहे. त्यानुषंगाने मीत्रा या संस्थेने आयोजित केलेल्या प्रशिक्षणाचा खर्च भागविण्यासाठी या संस्थेला अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे. त्यानुषंगाने पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन निर्णयः-**

भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा व महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांमधील अधिकारी/ कर्मचाऱ्यांसाठी महाराष्ट्र पर्यावरण व अभियांत्रिकी प्रशिक्षण आणि संशोधन संस्था (मीत्रा), नाशिक या संस्थेने सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात आयोजित केलेल्या प्रशिक्षणाच्या खर्चापोटी या संस्थेला रुपये ५२,४३,५००/- (अक्षरी रुपये बावन्न लक्ष त्रेचाळीस हजार पाचशे फक्त) इतके अनुदान वितरीत करण्यात येत आहे.

२. या शासन निर्णयान्वये वितरीत केलेली रक्कम कोषागारातून आहरित करण्यासाठी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे संचालक (वित्त), श्री.राजेंद्र मडके, यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून तर श्री.रा.म. गेंगजे, उप सचिव, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. संचालक (वित्त), मजीप्रा यांनी निधी आहरित केल्यानंतर सदर निधी मीत्रा, नाशिक या संस्थेकडे त्वरीत ऑनलाईन पद्धतीने हस्तांतरीत करावा. सदर निधी प्राप्त झाल्यानंतर संचालक, मीत्रा यांनी प्रत्यक्ष झालेल्या खर्चाप्रमाणे विहित नमुन्यामध्ये उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे. या अनुदानातून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके ठेवण्यात यावीत.

४. आहरित केलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच लेखाशीर्षाखाली नोंदविली गेली आहे किंवा नाही याची संचालक (वित्त), मजीप्रा यांनी खात्री करुन घ्यावी व त्याबाबतचे

प्रमाणपत्र १५ दिवसांच्या आत शासनास सादर करावे. आहरित केलेल्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयाशी मासिक ताळमेळ घेण्याची संपूर्ण जबाबदारी आहरण व संवितरण अधिकाऱ्यांची राहील.

५. प्रस्तुत प्रकरणी होणारा खर्च "मागणी क्र. वाय-५, ३४५१-सचिवालयीन- आर्थिक सेवा, (००)०९०- सचिवालय, (०२)-पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, (०२)(०३)- प्रशिक्षणावरील खर्च (कार्यक्रम) (३४५१ २८७१), ३१- सहायक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकून तो सन २०२२-२३ च्या मंजूर अर्थसंकल्पिय तरतूदीतून भागवावा.

६. नियोजन विभागाच्या सहमतीने तसेच वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्रमांक १५१/व्यय-३, दिनांक २५.०३.२०२३ अन्वये प्राप्त सहमतीनुसार तसेच बिम्स प्रणालीवर उपलब्ध केलेल्या निधीच्या मर्यादेत सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३२९१८३२४४५१२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

BALASAHEB
BABASAHEB
HAJARE

Digitally signed by BALASAHEB BABASAHEB HAJARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=49ad4eefa4101394c1b1119b5f2d93940a592bd8a91d2970b24702e05968e19f, pseudonym=ECB735300543A776F1DE714D85AF521F7953EAF5, serialNumber=0EDD9C3872935C071332E1F94CBCDC9828471B3251EEE2D5C23FD681EC41CEFA, cn=BALASAHEB BABASAHEB HAJARE
Date: 2023.03.29 18:51:24 +05'30'

**( बाळासाहेब बा. हजारे )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
३. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
४. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
५. आयुक्त, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे.

६. मुख्य प्रशासकीय अधिकारी, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
७. संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नवी मुंबई.
८. संचालक, महाराष्ट्र पर्यावरण व अभियांत्रिकी प्रशिक्षण आणि संशोधन संस्था (मीत्रा), नाशिक.
९. निवडनस्ती, पापु-२३.